बेलकुंड येथील शासकीय विश्रामगृह वन विभागास हस्तांतरीत करण्याबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण १११७/प्र.क्र.६१/मिव्य-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १९.०४.२०१७

**प्रस्तावना :**

याचिका क्रमांक ३९६० / २००६ मधील सिव्हिल अूप्लीकेशन नंबर २६३८/ २०१६ प्रकरणी उच्च न्यायालयाने दि. १६.०१.२०१७ रोजी दिलेल्या आदेशानुसार सा.बां. विभाग, अचलपूर यांच्या कार्यक्षेत्रातील बेलकुंड येथील शासकीय विश्रामगृह हे वनक्षेत्रात येत असून अतिसंरक्षित व्याघ्र प्रकल्पामध्ये स्थित असल्याने वन विभागास हस्तांतरीत करण्याबाबत मा. उच्च न्यायालयाने आदेशीत केले आहे. सदर विश्रामगृहाकरता सद्यस्थितीत खानसामा / चौकीदार आणि कक्षसेवक इत्यादी पदे रिक्त असल्याने व विश्रामगृह गुगामल राष्ट्रीय उद्यानाचे व्याघ्र प्रकल्प अतिसंरक्षित भागात येत असल्याने या ठिकाणी पर्यटकास व अभ्यागतांस येण्यास मनाई असल्याने विश्रामगृह बंद आहे. सदर विश्रामगृहाचे सार्वजनिक बांधकाम विभाग, अचलपूर यांच्या PRB नोंदवहीमध्ये नोंद असून विश्रामगृहाचे एकूण क्षेत्रफळ ०.६० एकर आहे. सदर विश्रामगृह वन विभागाच्या जमीनीवर बांधण्यात आलेले आहे. उच्च न्यायालयाने दि. १६.०१.२०१७ रोजी दिलेल्या आदेशानुसार सा.बां. विभाग, अचलपूर यांच्या कार्यक्षेत्रातील बेलकुंड येथील शासकी विश्रामगृह हे वनक्षेत्रात येत असून अतिसंरक्षित व्याघ्र प्रकल्पामध्ये स्थित असल्याने ते वन विभागास हस्तांतरीत करण्याची बाबत शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उपरोक्त प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दि. १६.०१.२०१७ रोजी दिलेल्या आदेशानुसार सार्वजनिक बांधकाम विभाग, अचलपूर यांच्या कार्यक्षेत्रातील बेलकुंड येथील शासकीय विश्रामगृह हे वन क्षेत्रात येत असून अतिसंरक्षित व्याघ्र प्रकल्पामध्ये स्थित असल्याने ते वन विभागास या शासन निर्णयान्वये हस्तांतरीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४१९१६३०५१२६१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sachin M Chivate

Digitally signed by Sachin M Chivate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=P W D, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6e7b26851b8dfa36d6a3064f810d85d8a14724 36e83e5056505816231cebe9fa, cn=Sachin M Chivate
Date: 2017.04.19 16:34:29 +05'30'

**(सचिन चिवटे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. प्रधान सचिव, वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती
५. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती
७. निवडनस्ती / मिव्य-२.